महाराष्ट्र राज्य सहकारी संघासाठी अनुदान"या योजनेंतर्गत धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, नागपूर या सहकारी प्रशिक्षण महाविद्यालयांस राज्य शासनाच्या हिश्श्याच्या अनुदानाची ७०% रक्कम अदा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-१०१५/ प्र.क्र.१०२/२२-स**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

तारीख: ५ नोव्हेंबर, २०१५

वाचा :-

१) शासन निर्णय, कृषी व सहकार विभाग क्रमांकः सीटीआर-१४७२/१५०७८-सी-७, दि.६.९.१९७२

२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः संकीर्ण २०१२/ प्र.क्र.१८/१२/ पुनर्बांधणी -११/ २२-स, दि.६.११.२०१२.

३) अप्पर निबंधक (ववनि), सहकार आयुक्त कार्यालय यांचे पत्र क्र.अंवनि/राज्यसंघ/ धंगप्रसा/ ७०%/२०१५, दि.२६.८.२०१५

४) अप्पर निबंधक (ववनि), सहकार आयुक्त कार्यालय यांचे पत्र क्र.अंवनि/निधी वितरण/विनि विधे ७२७/नमूना A २०१५, दि.१७.१०.२०१५.

५) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.१७.४.२०१५.

६) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.३४/कोषा.प्रशा.५, दि.२४.७.२०१५.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्य सहकारी संघ ही संस्था राज्यामध्ये सहकारी शिक्षण, प्रशिक्षण, प्रचार व प्रसाराचे काम करणारी संघीय संस्था असून या संघाच्या अधिपत्याखाली नागपूर येथे धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, नागपूर हे सहकारी प्रशिक्षण महाविद्यालय कार्यरत आहे. राष्ट्रीय सहकारी प्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, नागपूर या प्रशिक्षण विद्यालयाची स्थापना सन १९७२ साली केलेली असून केंद्र शासन व राज्य शासन यांनी ५०: ५० या गुणोत्तरीय प्रमाणामध्ये संस्थानचा खर्च वहन करण्याबाबतचे सूत्र विहित करण्यात आलेले आहे. सन २०१४-१५ करीता मंजूर असलेल्या रु.१००.०० लाख इतक्या तरतूदीतून ६०% म्हणजेच

रु.६०.००लाख दि.७ मार्च, २०१५ व दि.२३.३.२०१५ च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिले आहेत. धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, नागपूर या सहकारी प्रशिक्षण महाविद्यालयास सन २०१५-१६ करीता राज्य शासनाच्या ५० टक्के हिश्श्यापोटी देय असणारी ७०% रक्कम अदा करण्याबाबतचा प्रस्ताव अप्पर निबंधक, (वसुली व नियोजन) सहकारी संस्था, सहकार आयुक्त कार्यालय यांनी संदर्भाधीन क्र. ३ व क्र.४ येथील पत्रान्वये शासनास सादर केलेला आहे.

**शासन निर्णयः-**

सदर बाब विचारात घेऊन "महाराष्ट्र राज्य सहकारी संघाच्या अधिपत्याखालील धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, नागपूर या सहकारी प्रशिक्षण महाविद्यालयास राज्य शासनाच्या ५० टक्के हिश्यापोटी देय असणारी रक्कम २४२५, सहकार ००३ प्रशिक्षण (राज्य योजनांतर्गत योजना) (०२) (०२) राज्य सहकारी संघ ( २४२५०२१८) ३१, सहाय्यक अनुदाने ( वेतनेतर) याखालील सन २०१५-१६ करीता मंजूर असलेल्या रु. ५०.०० लक्ष या तरतुदीमधून ७०% म्हणजेच रु.३५.०० लाख इतकी रक्कम सदर संस्थेस उपलब्ध करुन देण्यात येत आहे. वित्त विभागाच्या क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१० एप्रिल, २०१५ च्या परिपत्रकानुसार एकूण वार्षिक तरतुदीच्या ७०% म्हणजे रु.३५ लाख इतकी रक्कम (बीम्सद्वारे) वितरित करण्यास सहमती देण्यात येत आहे.

२. उपरोक्त बाबींसाठी होणारा खर्च सन २०१५-१६ चालू आर्थिक वर्षी पुढील लेखाशिर्षाखाली मंजूर व उपलब्ध असलेल्या आर्थिक तरतुदीमधून भागविण्यात यावा:-२४२५, सहकार(०२) पंचवार्षिक योजना - (राज्य योजनांतर्गत योजना)(०२) (०२) राज्य सहकारी संघ (२४२५०२१८) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

३. सध्याची शैक्षणिक क्षेत्रातील फी आकारणी पहाता संस्थानाने आपल्या उत्पन्नाचे स्त्रोत वाढविण्यासाठी आकारण्यात येणाऱ्या फी शुल्कामध्ये पर्याप्त स्वरुपात वाढ करण्याच्या अधीन राहून सदर आर्थिक तरतूद वितरीत करण्यात येत आहे.

४. उपरोक्त रकमेचा धनादेश कोषागार कार्यालयातून काढून प्रत्यक्ष संस्थानास देण्याकरीता आहरण व संवितरण अधिकारी व नियंत्रक अधिकारी म्हणून पुढील अधिकाऱ्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे:-

आहरण व संवितरण अधिकारी- लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

नियंत्रक अधिकारी - अप्पर निबंधक (वसुली व नियोजन) सहकारी संस्था, सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

त्यांनी सदर सर्व रक्कम ज्या कारणासाठी मंजूर केली आहे त्याच कारणासाठी खर्ची पडेल याची दक्षता घ्यावी व सदर संस्थेस वितरित केलेली तरतूद रु.३५.०० लाख खर्च केल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावे.

५. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.१७.४.२०१५ च्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील लागू असलेल्या अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

६. संदर्भाधीन क्र.६ येथील वित्त विभागाच्या दि.२४.७.२०१५ च्या शासन परिपत्रकात नमूद केल्यानुसार पुढील बाबींची पूर्तता झालेली आहे:-

i) विभागास प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार ज्ञापनात नमूद करण्यात आले आहेत.

ii) सन २०१५-१६ करीता मंजूर निधी रु.५०.०० लाख इतका आहे.

iii) मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५ टक्के किंवा अधिक निधी खर्च झाला आहे.

iv) संक्षिप्त देयके प्रलंबित नाहीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०५१४५६०१२८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr Sudin Popat Gaikwad

Digitally signed by Dr Sudin Popat Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8ff188a569f4a95d2f0ce8ca61e60d8aa5f51a1bf65b42dd49bb26d165941d9e, cn=Dr Sudin Popat Gaikwad
Date: 2015.11.05 14:57:22 +05'30'

**( डॉ.सुदिन गायकवाड )**

उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.

२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर.

३) महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.

४) महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर.

५) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

९) लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१०) अप्पर निबंधक, (वसुली व नियोजन) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

११) सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण) तथा सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

१३) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी संघ, पुणे.

१४) प्राचार्य, धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, आयसीएम बस स्टॉप, मिनी बायपास रोड, न्यू नंदनवन, नागपूर- ४४०००९.

१५) कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१६) व्यय २, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१७) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

१८) निवड नस्ती, कार्यासन-२२-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.